# एलिझाबेथ केडी स्टॅन्टन

आणि

# स्त्रियांना मताधिकार

लेखिका: तान्या ली स्टोन

चित्रे: रेबेका गिब्बन



एलिझाबेथ केडी स्टॅन्टन एक अशी स्त्री होती जी आपल्या तत्वांसाठी आणि सिद्धांतांसाठी नेहमी झगडत असे. लहान वयातच तिला जाणीव झाली होती की स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे हक्क मिळत नाहीत. एकोणीसाव्या शतकातील अमेरिकेत, स्त्रियांना कॉलेजात जायची, स्वतःची संपत्ती बाळगायची आणि मत द्यायची परवानगी नव्हती. त्याऐवजी त्यांनी लवकर लग्न करावे, मुलांना जन्म द्यावा आणि आपल्या पतीचे घर सांभाळावे अशी त्यांच्याकडून अपेक्षा ठेवली जात असे. एलिझाबेथला घोडेस्वारी करायला आणि ग्रीक भाषा शिकायला आवडत असे. तिचे वडील म्हणत की एलिझाबेथ मुलगा असायला हवी होती.

पण आपल्या मर्यादांचा स्वीकार करण्याऐवजी एलिझाबेथ कॉलेजात गेली आणि समविचारी स्त्रियांना मताधिकारासाठी एकत्र करू लागली. ही कथा एका असामान्य स्त्रीची प्रेरणादायी कथा आहे. तिने संघर्ष करून अमेरिकेत मोठा बदल घडवून आणला.



# एलिझाबेथ केडी स्टॅन्टन

# आणि

# स्त्रियांना मताधिकार

मराठी अनुवादः सुशील मेन्सन






जर कुणी तुम्हाला म्हटलं की तुम्हाला जे बनायचंय ते तुम्ही बनू शकत नाही कारण तुम्ही एक मुलगी आहात, तर तुम्ही काय कराल?

जर कुणी तुम्हाला म्हटलं की तुमच्या मताला काही किंमत नाही, तुमच्या आवाजाने काही फरक पडत नाही कारण तुम्ही एक मुलगी आहात, तर तुम्ही काय कराल?

तुम्ही असं का म्हणून विचाराल?

तुम्ही प्रत्युत्तर द्याल?

तुम्ही संघर्ष कराल....

तुमच्या हक्कांसाठी?

एलिझाबेथने हे सगळं केलं.



*एलिझाबेथ केडी* लहान होती तेव्हा तिच्या आजुबाजुला हीच परिस्थिती होती.

एलिझाबेथने याच्याविरुद्ध संघर्ष केला नसता तर आजही हीच परिस्थिती कायम राहिली असती.



ती फक्त चार वर्षांची होती तेव्हा तिने एका स्त्रीला हे बोलताना ऐकलं की मुलांचं आयुष्य मुलींच्या तुलनेत खूप बरं असतं.

ती स्त्री एलिझाबेथच्या नवीनच जन्माला आलेल्या तान्ह्या बहिणीला भेटायला आली होती.

“मला दया येते हिची, ही मुलगी आहे म्हणून!”

एका तान्ह्या मुलीला बघून कुणाला दुःख कसं होऊ शकतं?

मुलगी म्हणून जन्माला येण्यात काय पाप आहे?



ती तेरा वर्षांची होती तेव्हा तिचे वडील न्यायाधीश केडी यांच्याकडे एक ग्रामीण स्त्री आली. तिच्या पतीचं निधन झालं होतं. त्या स्त्रीने आपलं सारं आयुष्य शेतावर घालवलेलं होतं. वडील म्हणाले की आता ते शेत तिच्याकडून ताब्यात घेण्यात येईल. कायद्यानुसार पतीच्या निधनानंतर त्या शेतावर तिची मालकी राहात नाही.

हा अन्याय पाहून एलिझाबेथ बिथरली.

ती म्हणाली की असा कायदा ताबडतोब रद्द करायला हवा.

न्यायाधीश केडींनी सांगितलं की तिच्या म्हणण्याने काही फरक पडत नाही. कायदा लागू करावाच लागेल.

आणि फक्त पुरुषांनाच कायदा बदलण्याची परवानगी आहे.






त्याच क्षणी एलिझाबेथने ठरवले की ती अशी सर्व कामे करेल जी मुलं करतात.



तिने खाचखळगे, अडथळे यांना पार करता येईल, अशी कुशल घोडेस्वारी शिकून घेतली.



ती खळाळत्या पाण्यात तराफा चालवायला शिकली.

ग्रीक भाषेच्या अभ्यासात सर्वोत्तम ठरल्याचा पुरस्कार तिने पटकावला.

तिच्या वडिलांना तिचा अभिमान वाटला.

पण त्यांना आपल्या ठाम विचारांची, नियम मोडणाऱ्या मुलीची काळजीही वाटली.



“अरेरे, तू मुलगा असायला हवी होतीस!”

वडील जाणत होते की एलिझाबेथ मुलगा असती तर तिचं आयुष्य सहजसोपं असतं.

पण एलिझाबेथला सहजसोप्या गोष्टींमध्ये रस नव्हता.




एलिझाबेथ सोळा वर्षांची होती, त्यावेळी मुलींना कॉलेजमध्ये शिकायची परवानगी नव्हती. एलिझाबेथने आपलं शिक्षण सुरू राहावं म्हणून आपल्याला मुलींच्या शाळेत पाठवावं, अशी विनंती वडिलांना केली.



ज्या वयात बहुतांशी तरूण मुलींची लग्नं होत होती, त्या भांडी घासत होत्या,



कपडे धुत होत्या,



मुलांची देखभाल करत होत्या,

त्या वयात एलिझाबेथ धर्म, गणित, विज्ञान, फ्रेंच भाषा आणि लेखन शिकू लागली.






बऱ्याच वर्षांनी एलिझाबेथची भेट *हेन्री स्टॅन्टन*शी झाली.

हेन्री जाचक जुनाट चालीरितींविरुद्ध बंड करत असे. तो गुलामगिरी प्रथेविरुद्ध लढ्यातही सक्रिय होता.

लोकांना त्यांचे हक्क न देणं, ही गोष्ट त्याला अन्यायकारक वाटत असे.





जेव्हा एलिझाबेथने हेन्रीशी स्वातंत्र्य या विषयावर गप्पा मारल्या, तेव्हा हेन्री तिला हसला नाही.

जेव्हा एलिझाबेथ म्हणाली की सर्व लोकांना आपल्या मनासारखं, आपल्या पद्धतीने जगण्याची मुभा असायला हवी, तेव्हाही हेन्री तिला हसला नाही.

जेव्हा हेन्रीचं नाव स्वत:च्या नावासोबत जोडायला एलिझाबेथने एक अट घातली की लग्न झाल्यावर ती तिचं आधीचं नाव पुसून टाकणार नाही, तेव्हाही हेन्री तिला हसला नाही.





मग एलिझाबेथ केडी लग्नानंतर *एलिझाबेथ केडी स्टॅन्टन* झाली. तिला सात मुलं झाली. तिने त्यांना अपार प्रेम दिलं. ती त्यांच्यासाठी स्वयंपाक करू लागली, त्यांचे कपडे धुऊ लागली, त्यांचे कपडे फाटले तर शिवू लागली, त्यांच्या कपड्यांना इस्त्री करू लागली.



तिला आपली मुलं खूप प्रिय होती, पण तिला स्वयंपाक, भांडी धुणं, फाटलेले कपडे शिवणं आणि कपडे इस्त्री करणं या गोष्टी आवडत नसत.



एकदा तिची मैत्रीण *ल्यक्रेशिया मॉट*ने तिला दुपारी जेवायला येण्याचं आमंत्रण दिलं.

ल्युक्रेशिया नेहमी एलिझाबेथचे पुरोगामी विचार इतर स्त्रियांपर्यंत पोहोचवत असे. स्त्रिया सर्व प्रकारची कामं करू शकतात आणि ती त्यांना करायला मिळणं हा त्यांचा हक्कच आहे, असं तिलाही वाटत असे. जेवायला आलेल्या इतर स्त्रियांनादेखील हे विचार पटले.



यामुळे एलिझाबेथला स्फूर्ती मिळाली. तिने स्त्रियांची एक सभा घेण्याचा प्रस्ताव समोर ठेवला.

या सभेत स्त्रिया मोठ्या संख्येने उपस्थित राहातील, चर्चा करतील, संवाद साधतील असं तिला वाटत होतं.

पण त्या कोणत्या विषयावर चर्चा करतील?



चर्चेच्या मुद्यांचं नियोजन करणं आवश्यक होतं.

पहिला मुद्दा, विवाहीत स्त्रियांना मालमत्ता वा स्वतः कमावलेली संपत्ती बाळगण्याचाही हक्क नाही!







दुसरा मुद्दा, कायदा केवळ पुरुषच बदलू शकतात! हे एलिझाबेथला फार पूर्वीच कळलं होतं.

कारण फक्त पुरुषच मतदान करू शकत होते.



# हीच तर खरी मेख होती!

स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला, तरच बदल घडणं शक्य होतं.

स्त्रिया मत देऊ शकल्या तर त्या सर्व प्रकारचे कायदे बदलण्यात मदत करू शकल्या असत्या.

त्याकाळी हा विचार इतका वेगळा, धाडसी आणि धक्कादायक होता की एलिझाबेथच्या मैत्रिणी गांगरूनच गेल्या!

जर या मैत्रिणीच चाट पडत असतील तर इतर लोकांचं काय?








एलिझाबेथ डगमगली नाही.

मतदानाचा हक्कच बदल घडवून आणेल, हे तिला पूर्णपणे पटलं होतं.

मतदानाच्या हक्कासाठी संघर्ष करावाच लागेल. “मतदानाचा हक्क मिळायलाच हवा. त्यासाठी लढा द्यायलाच हवा.”

तिचे पती हेन्री यांना तिचे विचार काळाच्या खूप पुढे आहेत, असं वाटू लागलं.





पण 19 जुलै 1848 रोजी, एलिझाबेथ सभेच्या ठिकाणी आली तेव्हा तिथलं दृश्य पाहून तिला जाणवलं की ती योग्य मार्गावर होती.

न्यूयॉर्क राज्यातील *सेनेका फॉल्स* या शहराचा छोटासा चर्च माणसांनी फुलून गेला होता.

एलिझाबेथ आणि इतर स्त्रियांनी मिळून लिहिलेला मसुदा सभेत वाचून दाखवण्यात आला.

त्यांच्या या जाहिरनाम्याने स्वातंत्र्याच्या जाहिरनाम्यातील *“सर्व मनुष्य समान आहेत”* या विचारालाच आव्हान दिले.

जाहिरनाम्याचं वाचन पूर्ण झाल्यावर एलिझाबेथने लोकांकडे पाहिलं. ती त्यांच्या प्रतिक्रियांची वाट पाहू लागली.








सभागृहात नीरव शांतता पसरली!

त्यानंतर गोंधळ सुरू झाला.

तो मोठा, मोठा, मोठा होत गेला. स्त्रियांना मतदानाचा हक्क असायला हवा की नको, यावर लोक वाद-विवाद करू लागले.






या सभेचा वृत्तांत वणव्यासारखा सर्वत्र पसरला.

देशभरच्या वृत्तपत्रांनी एलिझाबेथवर टीका केली.

पण इतर स्त्रियांनी तिच्या लढ्याला साथ दिली.

“स्त्रियांना मतदानाचा हक्क” ही गोष्ट *मेन* ते *कॅलिफोर्निया* राज्यांपर्यंत लोकांच्या कानात रुंजी घालू लागली.

एलिझाबेथने पाण्यात एक खडा टाकला आणि त्याचे तरंग दूर, दूर, अगदी दूरवर पसरत गेले.

एलिझाबेथने थांबायला पाहिजे, असं अनेकांचं मत होतं. पण ती आता थांबणार नव्हती. तिने अमेरिकेत मोठा बदल घडवून आणला.



एलिझाबेथ केडी स्टॅन्टन (1815 – 1902) आणि तिचे पती हेन्री स्टॅन्टन यांचं वैवाहिक आयुष्य सेहेचाळीस वर्षं टिकलं. दोघांनी मिळून आपल्या मुलांचं संगोपन केलं. या काळात, तिने स्त्रियांच्या हक्कांसाठी अविरत लढा दिला. 1866 साली काँग्रेसमध्ये सहभागी होण्याचाही प्रयत्न तिने केला. "मी पुरुषांसाठी मत देऊ शकत नाही पण पुरूष मात्र माझ्यासाठी मत देऊ शकतात" हे अन्यायकारक आहे, असा तिचा बिनतोड तर्क होता. 1869 साली, तिने आणि *सुसान बी. ॲन्थनी*ने मिळून राष्ट्रीय महिला मताधिकार संघटना स्थापन केली. एलिझाबेथने एकवीस वर्षं याची अध्यक्षा म्हणून काम पाहिलं.

एलिझाबेथने फक्त स्त्रियांच्या मताधिकारापुरतंच स्वत:ला बांधून घेतलं नाही. स्त्रियांचं क्रीडाविश्व, मालमत्ता आणि मुलांचं संगोपन करण्याचा हक्क, सहशिक्षण, समान वेतन, घटस्फोट कायद्यात सुधारणा, गुलामगिरीचं निर्मूलन आणि जन्म नियंत्रण यांविषयीही तिला आस्था होती. एलिझाबेथच्या मुलीने, *हॅरियट स्टॅन्टन ब्लॅच*ने, आपल्या आईच्या पावलावर पाऊल ठेवलं. 1907 साली, हॅरियटने स्व-सहाय्यक स्त्रियांचा *समता संघ* स्थापन केला.

एलिझाबेथच्या 80 व्या वाढदिवशी, सहा हजारांपेक्षा जास्त लोक न्यूयॉर्कच्या मेट्रोपॉलिटन ऑपेरा हाऊसमधील समारंभात उपस्थित राहिले. तिचा *ग्रँड ओल्ड वुमन ऑफ अमेरिका* असा सन्मान केला गेला आणि तो दिवस त्यावर्षी *स्टॅन्टन दिन* म्हणून घोषीत करण्यात आला. 2006 साली, न्यूयॉर्क राज्याने हा दिवस कायम सुट्टीचा दिवस म्हणून घोषीत केला.

26 ऑक्टोबर 1902 रोजी एलिझाबेथ केडी स्टॅन्टनचं निधन झालं. तिच्या निधनानंतर अठरा वर्षांनी स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळाला. ऑगस्ट 1920 मध्ये राज्यघटनेत एकोणीसावी दुरुस्ती करण्यात आली. हे सगळं एलिझाबेथच्या अविरत प्रयत्नांमुळे शक्य झालं. तिच्या या कार्यासाठी आपण तिचे सदोदीत ऋणी राहायला हवं.

समाप्त